**सुधारीत आदिवासी उपयोजना (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: आउयो-२४१६/प्र.क्र.१७७/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ९ ऑगस्ट, २०१७

वाचा:

१. **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), यांचे पत्र क्र. विप्र-७/ आउयो/ विघयो/ पुनर्विलोकन/ २६१/२०१६, दि. २७ एप्रिल, २०१६**
२. **मा. मंत्रीमंडळ सचिव यांचेकडून प्राप्त मा.मंत्रीमंडळ बैठकीचे कार्यवृत्त, दि. ४ ऑगस्ट, २०१७.**

**प्रस्तावना:-**

आदिवासी शेतकऱ्यांच्या उत्पन्नात वाढ करुन त्यांचे जीवनमान उंचावण्यासाठी आदिवासी शेतकऱ्यांना अर्थसहाय्य देण्याची आदिवासी उपयोजना (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) राज्यामध्ये सन १९९२-९३ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजनेमध्ये जमीन सुधारणा, निविदा पुरवठा, पीक संरक्षण अवजारे/शेतीची सुधारीत अवजारे, बैलगाडी, बैलजोडी/ रेडेजोडी, इनवेल बोअरिंग, जुनी विहीर दुरुस्ती, पाईपलाईन, पंपसेट, नवीन विहीर, परसबाग, शेततळे इत्यादी १३ घटकांसाठी विहित मर्यादेत शेतकऱ्यांना १००% अनुदान देण्यात येते. सदर योजना दिर्घ कालावधीपासून राबविण्यात येत असल्याने, योजनेचे पुनर्विलोकन करण्याचा निर्णय शासनाने घेतला. त्यासाठी विभागीय कृषी सहसंचालक, नागपूर यांचे अध्यक्षतेखाली, दि. २४ फेबुवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आली होती. सदर समितीने दि.१९ एप्रिल,२०१६ रोजी अहवाल सादर केला. कृषी आयुक्तालयाने दि. २७ एप्रिल, २०१६ च्या पत्रान्वये आयुक्तालयाच्या शिफारशीसह अहवाल शासनास सादर केला आहे. सदर अहवाल व बदललेल्या परिस्थितीत शेतकऱ्यांची आवश्कयता विचारात घेता आदिवासी उपयोजना (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) सुधारीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:**

अनुसूचित जमातीसाठी राबविण्यात येत असलेली आदिवासी उपयोजना (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) सुधारीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२ सदर सुधारीत आदिवासी उपयोजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) खालील घटकांसाठी त्यापुढे नमूद रकमेच्या मर्यादेत १००% अनुदान देण्यात येईल.

| अ.क्र. | बाब | अनुदानाची मर्यादा (रुपये) |
|---|---|---|
| १ | नवीन विहीर | २,५०,००० |
| २ | जुनी विहीर दुरुस्ती | ५०,००० |
| ३ | इनवेल बोअरींग | २०,००० |
| ४ | वीज जोडणी आकार | १०,००० |
| ५ | शेततळयांचे प्लॅस्टिक अस्तरीकरण | १,००,००० |
| ६ | परस बाग | ५०० |
| ७ | सूक्ष्म सिंचन संच<br>अ. ठिबक सिंचन<br>आ. तुषार सिंचन | <br>५०,०००<br>२५,००० |

३ सदर सुधारीत योजनेची अंमलबजावणी सन २०१७-१८ या वर्षापासून करण्यात येईल.

४ लाभार्थ्यास नवीन विहीर, जुनी विहीर दुरुस्ती किंवा शेततळ्याचे प्लॅस्टिक अस्तरीकरण यापैकी एकाच घटकाचा लाभ देय राहील.

५ नवीन विहीर या घटकाचा लाभ घेणाऱ्या शेतकऱ्यास विहीर, पंपसंचासाठी वीज जोडणी आकार, सूक्ष्म सिंचन संच या घटकांसह एकूण रु.३,१०,०००/रु.२,८५,००० एवढ्या मर्यादेत अनुदान देण्यात येईल. (विहीर-रु.२,५०,०००+ वीज जोडणी आकार रु.१०,००० + ठिबक सिंचन संच रु.५०,०००/ तुषार सिंचन संच रु.२५,००० = रु.३,१०,०००/रु.२,८५,०००)

६ जुनी विहीर दुरुस्ती या घटकाचा लाभ घेणा-या लाभार्थ्यास, विहीर दुरुस्ती व पंपसंचासाठी वीज जोडणी आकार, सूक्ष्म सिंचन संच या घटकांसह रु.१,१०,०००/रु.८५,००० च्या मर्यादेत एकत्रित पॅकेज देण्यात येईल. (जुनी विहीर दुरुस्ती -रु.५०,०००+ वीज जोडणी आकार रु.१०,००० + ठिबक सिंचन संच रु.५०,०००/ तुषार सिंचन संच रु.२५,००० = रु.१,१०,०००/रु.८५,०००)

७ शेततळयाचे प्लॅस्टिक अस्तरीकरण या घटकाचा लाभ घेणाऱ्या लाभार्थ्यास, प्लॅस्टीक अस्तरीकरण व पंपसंचासाठी वीज जोडणी आकार व सूक्ष्म सिंचन या घटकांसह रु. १,६०,०००/ रु.१,३५,००० च्या मर्यादेत एकत्रित पॅकेज देण्यात येईल. (शेततळयाचे प्लॅस्टिक अस्तरीकरण - रु.१,००,०००+ वीज जोडणी आकार रु.१०,००० + ठिबक सिंचन संच रु.५०,०००/ तुषार सिंचन संच रु.२५,००० = रु.१,६०,०००/रु.१,३५,०००)

८ लाभार्थ्याकडे जर काही घटक उपलब्ध असतील तर उर्वरीत आवश्यक घटकांचा लाभ विहीत मर्यादेत देण्यात येईल. (उदा.विहीर असल्यास वीज जोडणी, सूक्ष्म सिंचन संच. विहीर व पंपसंच असल्यास सूक्ष्म सिंचन संच इ.)

९ उपरोक्त घटकांचा लाभ घेतल्यानंतरही लाभार्थ्याने इनवेल बोअरींग व परसबाग या घटकांची मागणी केल्यास सदर घटकांचा अतिरिक्त लाभ देण्यात येईल.

१० प्लॅस्टीक अस्तरीकरणासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे ३०० मायक्रॉनच्या प्लॅस्टीकसाठी रु.९५/चौ.मि. या दराने कमाल मर्यादा रु.१,००,००० (रु. एक लाख फक्त) च्या मर्यादेत अनुदान अनुज्ञेय असेल.

११ अनुदानाची महत्तम मर्यादा निश्चित करण्यात आली आहे. तथापि, प्रत्यक्ष खर्च जर अनुदान मर्यादेपेक्षा कमी असेल तर प्रत्यक्ष खर्चाएवढे अनुदान देण्यात येईल.

१२ नवीन विहीर, जुनी विहीर दुरुस्ती, शेततळयाचे प्लॅस्टिक अस्तरीकरण किंवा पाण्याचा स्त्रोत उपलब्ध असणाऱ्या लाभार्थ्याची या योजनेंतर्गत एखादया घटकासाठी निवड झाल्यास त्यास आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या योजनेतून प्राथम्य क्रमाने पंपसंच मंजूर करण्यात यावा.

१३ आदिवासी उपयोजनेंतर्गत निवड झालेल्या लाभार्थ्यास पंपसंच देणे आवश्यक असल्यास, पंपसंचाचा प्रस्ताव, कृषी विकास अधिकारी यांनी आदिवासी विकास विभागाची पंपसंचाची योजना राबविणाऱ्या यंत्रणेकडे पाठवून प्राथम्य क्रमाने पंपसंच मंजूर करुन घेण्याची कार्यवाही करावी.

१४ लाभार्थ्यास महावितरण कंपनीकडून सोलर पंप मंजूर झाला असेल तर, पंपसंच व वीज जोडणीसाठी अनुज्ञेय अनुदानाच्या मर्यादेत (रु.३५,०००) लाभार्थी हिस्सा आदिवासी विकास विभागाकडून राबविल्या जाणाऱ्या योजनेतून महावितरण कंपनीकडे भरण्यात येईल.

१५ सदर योजनेंतर्गत सूक्ष्म सिंचनासाठी देण्यात येणारे अनुदान प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत देण्यात येणाऱ्या अनुदानास पूरक अनुदान देऊन आदिवासी शेतकऱ्यांना एकूण खर्चाच्या ९०% च्या मर्यादेत अनुदान देण्यात येइल.

१६ याबाबतची कार्यपद्धती कृषी आयुक्तालयाकडून स्वतंत्रपणे विहित करण्यात येईल.

१७ लाभार्थ्याला देय अनुदानाची रक्कम त्याच्या बँक खात्यावर आरटीजीएस द्वारे जमा करण्यात यावी.

१८ लाभार्थीची यादी शासनाच्या वेबसाईटरवर उपलब्ध करण्यात यावी.

१९ सदर योजना आदिवासी विकास विभागाने प्रत्येक वर्षात उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या मर्यादेत राबविण्यात येईल.

**२०. <u>पात्रतेच्या अटी:</u>**

आदिवासी उपयोजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) योजनेचा लाभ घेण्यासाठी खालील अटींची पूर्तता करणारे लाभार्थी पात्र असतील:

I. लाभार्थी हा अनुसूचित जमातीचा शेतकरी असला पाहिजे.
II. शेतकऱ्याकडे जात वैधता प्रमाणपत्र असणे आवश्यक आहे.
III. शेतकऱ्याच्या नावे जमिन धारणेचा ७/१२ दाखला, ८-अ चा उतारा असणे आवश्यक आहे.
IV. लाभार्थ्याकडे आधार कार्ड असणे आवश्यक आहे.
V. लाभार्थ्याचे बँक खाते असणे व सदर बँक खाते आधार कार्डशी संलग्न असणे आवश्यक आहे.
VI. दारीद्रय रेषेखालील लाभार्थ्यास प्रथम प्राधान्य.
VII. दारीद्रय रेषेखाली नसलेले अनुसूचित जमातीचे शेतकरी खालील अटींची पूर्तता करत असतील तरच योजनेचा लाभ घेण्यास पात्र असतील.
   **अ.** शेतकऱ्याचे सर्व मार्गांनी मिळणारे वार्षिक उत्पन्न रु.१,५०,००० पेक्षा जास्त नसेल.
   **आ.** सदर शेतकऱ्याकडे किमान ०.४० हेक्टर व कमाल ६ हेक्टर एवढी शेत जमीन असेल.
   **इ.** विहीर या घटकाचा लाभ घेणाऱ्या दारिद्रय रेषेखालील शेतकऱ्यांनासुद्धा कमीत कमी ०.४० हे. एवढी जमीन असणे आवश्यक असेल.

VIII. लाभार्थी निवडीचा प्राथम्यक्रम पुढील प्रमाणे असेल.

१. दारिद्रय रेषेखाली लाभार्थी २. आदिम जमाती. ३. वैयक्तिक वनहक्क पट्टेधारक लाभाथी (IFR Holder)

IX. एकदा संबंधित योजनेचा पूर्ण लाभ घेतल्यास पुढील पाच वर्ष त्याच लाभार्थ्यास किंवा कुटूंबास या योजनेचा लाभ देय होणार नाही.

X. अशाच स्वरुपाच्या कृषी विषयक विकास योजनेकरता आदिवासी उपयोजनेतून तसेच केंद्र शासनाच्या SCA व घटनेच्या कलम २७५ (A) अंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून राबविण्यात येणाऱ्या योजनेतून लाभ दिला असल्यास या योजनेंतर्गत देण्यात येणारा लाभ अनुज्ञेय असणार नाही.

XI. सदर योजनेचा लाभ घेतलेल्या लाभार्थ्याच्या ७/१२ उताऱ्यावर त्याबाबतची नोंद घेण्यात येईल.

**२१. <u>लाभार्थी निवडीची कार्यपद्धती:</u>**

१. योजनेची अंमलबजावणी जिल्हा परीषदेमार्फत करण्यात येईल.

२. लाभार्थ्यांकडून अर्ज स्वीकारण्यासाठी संगणक आज्ञावली विकसीत करण्यात यावी. प्रत्येक वर्षी लाभार्थी निवडीसाठी वृत्तपत्रामध्ये जाहिरात देऊन गट विकास अधिकारी यांचेकडून विहित नमून्यात अर्ज ऑनलाईन स्विकारण्यात येतील.

३. शेतकऱ्यांनी अर्जासोबत खालील कागदपत्रे सादर करणे आवश्यक राहील.

३.१- अर्जावर अर्जदाराचे अलीकडे काढलेले छायाचित्र,

३.२- जात वैधता प्रमाणपत्राची प्रत,

३.३- शेतकरी दारिद्रय रेषेखाली नसल्यास सक्षम प्राधिकाऱ्याचा उत्पन्नाचा दाखला.

३.३- जमिन धारणेचा ७/१२ चा दाखला , ८-अ चा उतारा,

३.४- आधार कार्डाची प्रत,

३.५- बँकेच्या पास-बुकाची प्रत,

४. प्रचलित आदिवासी उपयोजनेंतर्गत (क्षेत्रांतर्गत/क्षेत्राबाहेरील) योजनेच्या लाभार्थी निवडीसाठी असलेल्या अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद, यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे असलेल्या समितीकडून लॉटरी पद्धतीने लाभार्थ्यांची निवड करण्यात येईल.

| १. | **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद** | **अध्यक्ष** |
|---|---|---|
| २. | जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| ३. | कार्यकारी अभियंता, लघुसिंचन, जिल्हा परिषद | सदस्य |
| ४. | भूजल सर्वेक्षण यंत्रणेचे जिल्हास्तरीय अधिकारी | सदस्य |
| ५. | जिल्हा प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास विभाग | सदस्य |
| ६. | कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य सचिव |

४. लाभार्थ्यांची निवड त्या-त्या वर्षात उपलब्ध झालेल्या अनुदानाच्या मर्यादेतच करण्यात यावी.

५. निवड झालेल्या लाभार्थ्यांपैकी काही लाभार्थी योजनेचा लाभ न घेण्याचीही शक्यता असते. यास्तव, यापूर्वी योजनेची अंमलबजावणी करताना जिल्हा परीषदेला आलेल्या अनुभवाच्या आधारे आवश्यक तेवढ्या अधिकच्या लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी व सदर लाभार्थ्यांना त्यांच्या ऑनलाईन अर्जाच्या क्रमवारीनुसार प्रतिक्षाधीन क्रमांक देण्यात यावेत. त्यांना कळविण्यात आलेल्या पत्रामध्ये, निवड झालेल्या लाभार्थ्यांपैकी काही लाभार्थ्यांची निवड अपरीहार्य कारणास्तव रद्द झाल्यासच त्यांची प्राथम्य क्रमानुसार निवड करण्यात येईल, असे स्पष्टपणे कळविण्यात यावे.

६. ज्या अर्जदाराकडे कोणत्याही प्रकारची शासकीय देणे उदा. शासकीय किंवा बँक कर्जाची परतफेड, वीजेचे बील, पाणीपट्टी इ. ची थकबाकी असेल अशा अर्जदाराची योजनेचा लाभ घेण्यासाठी निवड करण्यात येणार नाही. अशा अर्जदाराची निवड झाली असेल व सदरची बाब नंतर निदर्शनास आली तरी सदर अर्जदाराची निवड रद्द करण्यात यावी.

२२. **<u>लाभार्थ्यांची निवड रद्द करणे व त्याऐवजी नवीन लाभार्थ्यांची निवड करणे:</u>**

पुढील परिस्थितीत निवड करण्यात आलेल्या लाभार्थ्यांची निवड रद्द करण्यात येईल.

१. निवड केलेल्या शेतकऱ्याचे निधन झाल्यास.

२. निवड झालेल्या शेतकऱ्याने आपली सर्व शेतजमीन विकून तो भूमीहीन झाला असल्यासच

३. निवड झालेल्या शेतकऱ्याने अर्थसहाय्य घेण्यास नकार दिल्यास.

४. मृत लाभधारकाऐवजी त्याचा वारसदार योजनेचा लाभ घेण्यास इच्छूक असल्यास त्याची निवड प्राथम्याने करण्यात यावी.

५. इतर बाबतीत प्रतिक्षा यादीतील प्राथम्य क्रमानुसार लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८०९१५२१०९९१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.08.09 15:13:09 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री (कृषी), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री (कृषी व पणन), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास), महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

७. अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. अ.मु.स. (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१०.सर्व कार्यकारी अधिकारी (जिल्हा परीषद)
११.आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.आयुक्त (आदिवासी), नाशिक
१३.सर्व कार्यकारी अधिकारी (जिल्हा परीषद)
१४.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१६.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१७.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१८. सर्व कृषी विकास अधिकारी
१९.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
२१.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२२.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२३.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२४.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी, औरंगाबाद.
२५.उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद.
२६.सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२७.निवडनस्ती.